**कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दिनांक ०१/०३/२०१७ ते ३०/०९/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मुदतवाढ २०१७/(१६०/१७)/मोप्र-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १६/०५/२०१७.

<u>पहावे</u> : १. शासन निर्णय क्रमांक - मुदतवाढ २०१६/(५९५/२०१६)/मोप्र-२, दिनांक ३०/०१/२०१७.
२. विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्रमांक ५७८/विपाविम/काआ-३/ महामंडळ १० पदे/ मुदतवाढ/२०१७, दिनांक २४/०१/२०१७.
३. विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्रमांक २१५७/विपाविम/काआ-३/ महामंडळ १० पदे/ मुदतवाढ/२०१७, दिनांक २०/०३/२०१७.
४. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०/०२/२०१७.

**<u>प्रस्तावना :-</u>**

कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील १० पदांना दिनांक २८/०२/२०१७ पर्यंत संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती. सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतिबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तात्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना २८ फेब्रुवारी, २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले होते. तथापी सर्व प्रशासकीय विभागांची सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याबाबतची कार्यवाही अद्याप पूर्ण झालेली नाही. ही बाबत विचारात घेऊन संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ३०/०९/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

आता संदर्भीय क्र. २ व ३ अन्वये कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांनी प्रस्तावित केल्यानुसार सोबतच्या **परिशिष्ट- अ** मधील नियत अस्थायी आस्थापनेवरील १० पदांना दिनांक ०१.०३.२०१७ ते दि. ३०.०९.२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

यावर होणारा खर्च " मागणी क्रमांक आय-५, ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०, सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गंतवणूक, (०४) वेतनावरील खर्चासाठी भागभांडवली अंशदान (योजनेतर), (०४)(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (संगणक संकेतांक (४७०१ आय १७१) (दत्तमत)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १०/०२/२०१७ यानुसार विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार व आंतरवित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१६१६२८०४८३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Pandurang Tulshiram Kedare

Digitally signed by Pandurang Tulshiram Kedare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e594e26c6ca4bffd8b1d4e20a155e473c21b0dd40f25c25bd478079005896501, cn=Pandurang Tulshiram Kedare
Date: 2017.05.16 16:32:26 +05'30'

**( पां.तु. केदारे )**
शासनाचे अवर सचिव

**सहपत्र : परिशिष्ट - "अ"**

**प्रत : सहपत्रासह**

१) महालेखापाल - १ / २ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
२) महालेखापाल - १ / २ (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
३) वित्त विभाग /(व्यय-१२), मंत्रालय, मुंबई.
४) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
५) मोप्र-२ संग्रहार्थ.

## परिशिष्ट - अ

**शासन निर्णय : मुदतवाढ २०१७/(१६०/१७)/मोप्र-२ दिनांक : १६/०५/२०१७**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर | १ | कार्यकारी संचालक | १ |
| | | २ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी | १ |
| | | ३ | अधिक्षक अभियंता | १ |
| | | ४ | सहायक संचालक (वित्त) | १ |
| | | ५ | लेखा अधिकारी ( महावित्त व लेखा सेवा) | ३ |
| | | ६ | सहायक लेखा अधिकारी | ३ |
| | | | **एकूण पदे** | **१०** |